सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्य पुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशन राबविण्यासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीतुन निधी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७२४/प्र.क्र.४२/ई-१०४०२००/१अे**

**(ई-फाईल क्र.कृवपदुम-१२०२७/५१/२०२५-MAG-1A संगणक क्र.१०४०२००)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :-२७ मार्च, २०२५.

वाचा :- १. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.जैशेमि-१०१८/प्र.क्र.१२५/१७-अे, दिनांक १६.१०.२०१८.

२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २७२२/प्र.क्र.६९/१-अे, २७.०६.२०२३.

३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२७२४/प्र.क्र.४२/१-अे, दिनांक २४.०९.२०२४.

४. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/डॉपंदेनैशेमि/निमा/३०८/२०२५, दिनांक १३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्य पुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन विदर्भातील बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ व वर्धा या सहा जिल्हयात राबविण्यास संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनला सन २०२२-२३ ते सन २०२७-२८ पर्यंत मुदतवाढ देऊन योजनेची व्याप्ती राज्यभर वाढवून डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनला "डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशन" असे संबोधण्यास संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

सदर योजना गट आधारीत असून ५० हेक्टर क्षेत्राचा एक गट याप्रमाणे गट स्थापन करण्यात येतात. योजने अंतर्गत एकदा निवड केलेल्या गट/लाभार्थीस ३ वर्ष लाभ देण्यात येतो. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये रुपये ४०००.०० लाख अनुदान वितरीत करण्यात आले आहे. मागील तीन वर्षात स्थापन करण्यात आलेल्या गटांना अनुज्ञेय व देणे शिल्लक असलेले अनुदान वितरित करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्य पुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशनच्या अंमलबजावणीसाठी व मागील तीन वर्षात स्थापन करण्यात आलेल्या गटांना अनुज्ञेय व देणे शिल्लक असलेले अनुदान वितरित करण्यासाठी खाली नमूद लेखाशिर्षाखाली रुपये ११.९९५२ कोटी इतका निधी आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | रक्कम |
|---|---|---|
| १. | मागणी क्र. डी-३<br>२४०१, पीक संवर्धन<br>१०५, खते व रासायनिक खते<br>(००)(३७) सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती (राज्य कार्यक्रम)<br>डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनसाठी मिशन प्रोजेक्ट मॅनेजमेंट बोर्ड यांना सहायक अनुदान (कार्यक्रम)<br>३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)<br>(२४०१ ए९३१) | रू.११.९९५२ कोटी |
| | एकूण | रु.११.९९५२ कोटी |

३. सदर योजनेच्या राज्यस्तरीय अंमलबजावणीकरीता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे-

१) सदर योजना आयुक्त कृषि यांनी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार व निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

५) सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/निविदा नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/सार्वजनिक बांधकाम विभाग/मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार/भारताचे नियंत्रक आणि महालेखापरिक्षकांच्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय / नियम/परिपत्रक/तरतुदी नुसार, अर्थसंकल्प व कोषागार नियमावली नुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी.कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

६) सदर योजनेकरीता होणाऱ्या खर्चास अनुसरुन आवश्यकतेनुसारच कोषागारतुन निधी आहरित करावा.

७) सदर निधी वितरण /खर्च संदर्भ क्र.०४ येथील कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २७२२/प्र.क्र.६९/१-अे, दिनांक २७.०६.२०२३ मधील तरतूदीनुसार सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे करण्यात यावे.

८) अनुदान वितरीत करताना थेट लाभ हस्तांतरण (D.B.T.) प्रणालीव्दारे करुन अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या बँक खात्यात थेट जमा करण्यात करण्यात यावी.

९) निधी वितरणानंतर त्यासंबंधीची उपयोगिता प्रमाणपत्रे तात्काळ शासनास सादर करावीत.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्त विभागाने अनौ.संदर्भ क्रमांक १२२/२०२५/व्यय-१ दिनांक २६.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१७४४३४८००१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH HANMANT PADHYE

Digitally signed by RAJESH HANMANT PADHYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=dc153114bd075a6b1e46ab4a44e410949fb23ba3456957504838af4a35a9b324, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A4545183145BB7CEBA2B281345FCFBF965C36542037F7724F53C8F43E1DBA1D4, cn=RAJESH HANMANT PADHYE
Date: 2025.03.27 17:45:41 +05'30'

**( राजेश पाध्ये )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. मा.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. प्रकल्प संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशन, अकोला.
११. सर्व प्रकल्प संचालक, आत्मा.
१२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/अकोला.
१४. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.